दखलपात्र गुन्हे तात्काळ नोंदवून त्यांचा
**तपास करण्याबाबत.......**

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
परिपत्रक क्र.सीआरटी २००३/८८७/पोल-११,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,दिनांक १ ऑक्टोबर,२००३

**परिपत्रक**

शासन परिपत्रक क्र.कोर्ट/२००३/८८७/पोल-१३, दिनांक ९ डिसेंबर,१९९८ अन्वये दखलपात्र गुन्हे तात्काळ नोंदवून त्यांच्या तपासाबाबत सूचना देण्यात आल्या आहेत, असे असूनही सदर परिपत्रकाची काटेकोर अंमलबजावणी होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. सदर परिपत्रकाची प्रत सोबत जोडली आहे.

२. या पार्श्वभूमीवर सर्व संबंधित पोलीस अधिकारी / कर्मचा-यांना पुनःश्च असे आदेश देण्यात येतात की, फौजदारी प्रक्रिया संहिता कलम १५४ अन्वये निर्धारित केलेल्या कार्यपध्दतीचे पालन करणे त्यांचे आद्य कर्तव्य आहे. दखलपात्र गुन्हा घडल्याचे निदर्शनास आल्याबरोबर त्यांनी विनाविलंब गुन्हा नोंदवून त्याचा कायद्याप्रमाणे योग्य प्रकारे तपास करावा.

३. सर्व संबंधित पोलीस आयुक्तांनी / पोलीस अधिक्षकांनी वरील आदेशांची नोंद घेवून ते त्यांच्या कार्यक्षेत्रातील /नियंत्रणाखालील सर्व पोलीस ठाण्यांच्या आणि पोलीस अधिका-यांच्या निदर्शनाला सदर बाब आणावी आणि त्यांचे अनुपालन होईल याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत कुचराई झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित अधिकारी / कर्मचारी यांच्यावर नियमांतर्गत शासनाचे आदेश न पाळल्याबद्दल तसेच स्वतःच्या कर्तव्यामध्ये कसूर केल्याबद्दल विभागीय चौकशी करुन कठोर कारवाई केली जाईल, याची कृपया नोंद घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(डॉ. हर्षदिप कांबळे),
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

पोलीस महासंचालक व महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधीक्षक.

**दखलपात्र गुन्हे तात्काळ नोंदवून**
**त्यांचा तपास करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**परिपत्रक क्र. कोर्ट-११९८/८०/पोल-१३,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक ९ डिसेंबर,१९९८.**

**परिपत्रक**

मुंबई उच्च न्यायालयाने श्री. मोहमंद सिराज मोहमंद नासिम यांनी महाराष्ट्र राज्य व इतर यांच्याविरुध्द दाखल केलेल्या क्रिमीनल रिट पिटीशन नं.९७०/१९९२ मध्ये दि. २३.६.१९९३ रोजी दिलेल्या आदेशामध्ये असे म्हटले होते की, पिटीशनरच्या तक्रारीत दखलपात्र गुन्हा घडल्याचे स्पष्ट होते. म्हणून त्याप्रकरणी तपास करावा आणि सर्व संबंधितांविरुध्द कायद्यानुसार कारवाई करावी. त्यानुसार बृहन्मुंबई पोलीसांच्या गुन्हे प्रकटीकरण शाखा, गुन्हा अन्वेषण विभागाने गुन्हा नोंदवून त्याचा तपास करणे आवश्यक होते. तथापि, संबंधित पोलीस अधिकाऱ्यांनी सदर आदेशांचा चुकीचा अन्वयार्थ लावला व गुन्हा नोंदविला नाही. उच्च न्यायालयाच्या आदेशांचे पालन झाले नाही म्हणून पिटीशनरकडून मुंबई उच्च न्यायालयात शासनाविरुध्द अवमान याचिका दाखल केली गेली. त्यामुळे गुन्हा नोंदवून कार्यवाही करण्याबाबत संबंधितांना आदेश आले. अवमान याचिकेच्या सुनावणी दरम्यान उच्च न्यायालयाने महाअधिवक्त्याच्या असेही निदर्शनास आणले की, न्यायालयात अश्यासंदर्भात दाखल केलेल्या जवळपास ३० टक्के प्रकरणात दखलपात्र गुन्हा घडून देखील कायद्याप्रमाणे गुन्हा नोंदवून घेतला जात नाही व सर्वसामान्य जनतेला न्यायालयात धाव घ्यावी लागते, अशा प्रकारची पुनरावृत्ती टाळणे आवश्यक आहे.

२. वरील घटनेच्या पार्श्वभूमीवर सर्व संबंधित पोलीस अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांना असे आदेश देण्यात येतात की, फौजदारी प्रक्रिया संहिता कलम १५४ अन्वये निर्धारित केलेल्या कार्यपध्दतीचे पालन करणे त्यांचे आद्य कर्तव्य आहे. दखलपात्र गुन्हा घडल्याचे निदर्शनाला आल्याबरोबर त्यांनी विनाविलंब गुन्हा नोंदवून त्याचा कायद्याप्रमाणे योग्य प्रकारे तपास करावा.

३. सर्व संबंधित पोलीस आयुक्तांनी/ पोलीस अधीक्षकांनी वरील आदेशांची नोंद घेवून ते त्यांच्या कार्यक्षेतील/ नियंत्रणाखालील सर्व पोलीस ठाण्यांच्या आणि पोलीस अधिकाऱ्यांच्या निदर्शनाला सदर बाब आणावी आणि त्याचं अनुपालन होईल याबाबत दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही

(अ.दा. कारखानीस)
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त ,
सर्व पोलीस अधीक्षक